**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांच्या मानधनात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-एबावि-२०११/प्र.क्र.३४१/का-६
नवीन प्रशासन भवन,३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक :- २३ नोव्हेंबर, २०११

**वाचा :-** १. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००८/प्र.क्र.२०४/का-६, दि. १.०७.२००९
२. शासन परिपत्रक, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००९/प्र.क्र.६५/का-६, दि. १५.१०.२००९
३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि २०१०/प्र.क्र.१८६/का-६, दि. १७.०१.२०११
४. केंद्र शासन, महिला व बाल विकास विभाग, एफ.क्र.१-१/२०११-सी.डी.-१, दि. ११ जुले.२०११ चे पत्र

**प्रस्तावना :-** वाचा क्र.१ येथील शासन निर्णयानुसार अंगणवाडी कर्मचा-यांना केंद्र शासनामार्फत देण्यात येणा-या मानधनात दिनांक १ एप्रिल, २००८ पासून वाढ करण्यात आली होती. वाचा क्र.२ नुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत पूरकपोषण आहाराव्यतिरिक्त इतर बाबींवर होणारा खर्च केंद्र व राज्य शासन अनुक्रमे ९०:१० या प्रमाणात करणेबाबतच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. वाचा क्र.३ अन्वये राज्य शासनाकडून देण्यात येणा-या मानधनात दिनांक १ जानेवारी, २०११ पासून वाढ करण्यात आलेली होती. वाचा क्र.४ नुसार केंद्र शासनाने दिनांक १ एप्रिल, २०११ पासून अंगणवाडी कर्मचा-यांच्या मानधनात वाढ केली आहे. त्यामुळे केंद्र शासनामार्फत घोषित करण्यात आलेली मानधन वाढ (९०% केंद्र शासन : १०% राज्य शासन) देण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांना दिनांक १ एप्रिल, २०११ पासून दरमहा अनुक्रमे रु.१५००/-, रु.७५०/- व रु.७५०/- एवढी मानधन वाढ केलेली आहे. त्यामुळे दिनांक १ एप्रिल, २०११ पासून अंगणवाडी कर्मचा-यांना केंद्र शासनाने केलेल्या दरमहा मानधन वाढीमुळे या मानधनी कर्मचा-यांना सुधारित केंद्र व राज्य शासनाचे मानधन खालीलप्रमाणे राहील :-

| अ. क्र. | पदाचे नाव | केंद्र शासनाचे सध्याचे मानधन ( रुपये) | राज्य शासनाचे सध्याचे मानधन ( रुपये) | सध्या देण्यात येणारे केंद्र शासनाचे + राज्य शासनाचे एकूण मानधन | केंद्र शासनाने दिनांक १ एप्रिल, २०११ पासून नव्याने केलेली मानधन वाढ ( रुपये) | एकुण द्यावयाचे मानधन केंद्र शासनाचे + राज्य शासनाचे (रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | **अंगणवाडी सेविका** एस.एस.सी. अनुत्तीर्ण | १४३८/- | १०५०/- | २४८८/- | १५००/- | ३९८८/- |
| २ | **अंगणवाडी सेविका** एस.एस.सी. अनुत्तीर्ण (५ वर्षे अनुभव) | १४६९/- | १०५०/- | २५१९/- | १५००/- | ४०१९/- |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ३ | **अंगणवाडी सेविका** एस.एस.सी.अनुत्तीर्ण (१० वर्षे अनुभव) | १५००/- | १०५०/- | २५५०/- | १५००/- | ४०५०/- |
| ४ | **अंगणवाडी सेविका** एस.एस.सी. उत्तीर्ण | १५००/- | १०५०/- | २५५०/- | १५००/- | ४०५०/- |
| ५ | **अंगणवाडी सेविका** एस.एस.सी.उत्तीर्ण (५ वर्षे अनुभव) | १५३१/- | १०५०/- | २५८१/- | १५००/- | ४०८१/- |
| ६ | **अंगणवाडी सेविका** एस.एस.सी. उत्तीर्ण (१० वर्षे अनुभव) | १५६३/- | १०५०/- | २६१३/- | १५००/- | ४११३/- |
| ७ | मदतनीस | ७५०/- | ५००/- | १२५०/- | ७५०/- | २०००/- |
| ८ | मिनी अंगणवाडी सेविका | ७५०/- | ४५०/- | १२००/- | ७५०/- | १९५०/- |

तरी डिसेंबर, २०११ महिन्यापासून वरीलप्रमाणे वाढीव मानधन देण्यात यावे. तसेच एप्रिल ते नोव्हेंबर, २०११ ची थकबाकी अदा करण्यात यावी.

२. यासाठी होणारा खर्च :-

(१) मागणी क्रमांक एक्स-१,
२२३६,पोषण आहार,
०२, पोषक अन्न व पेये वितरण,
१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,
केंद्र पुरस्कृत योजना (नागरी)
(०१) (०३) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (२२३६ ०५१ ९)
(केंद्र पुरस्कृत योजना ९० टक्के)
०२ - मजुरी

(२) मागणी क्रमांक एक्स-१,
२२३६,पोषण आहार,
०२, पोषक अन्न व पेये वितरण,
१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,
राज्य योजनाअंतर्गत योजना (नागरी)
(०१) (०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना-अंमलबजावणी व प्रशासकीय खर्च (२२३६ १३८ २)
(१० टक्के राज्य हिस्सा)
०२ - मजुरी

(३) मागणी क्रमांक एक्स-१,
२२३६,पोषण आहार,
०२, पोषक अन्न व पेये वितरण,
१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,
८०, सर्वसाधारण
००१ संचालन व प्रशासन
(०५) (०४) एकात्मिक बाल विकास योजना (ग्रामीण) (२२३६ १३९ १)
(केंद्र पुरस्कृत योजना)
०२ - मजुरी

(४) मागणी क्रमांक एक्स-१,
२२३६,पोषण आहार,
०२, पोषक अन्न व पेये वितरण,
१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,
८०, सर्वसाधारण
००१ संचालन व प्रशासन
(०५) (०५) एकात्मिक बाल विकास योजना (ग्रामीण) (२२३६ १४० ८)
०२ - मजुरी

या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६६३/११/व्यय-६, दिनांक २३.११.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१११११२३०९३९५१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श. पा. वारे)
उप सचिव

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व मंत्रालयीन विभाग.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, रायगड भवन, नवी मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय,विधान भवन, मुंबई ३२
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती (कार्यासन ६)